**चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी यांचे अखत्यारीतील योजनांतर्गत योजनेतील २८ अस्थायी पदांना सन २०२०-२१ कालावधी करिता मुदतवाढ देणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४३/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ३० सप्टेंबर, २०२०

वाचा :-

१. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/ योजनेत्तर/प्र.क्र.५३/१९-२०/१७५२, दिनांक १८.२.२०२०
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२०
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४३/फ-९, दि.३०.०३.२०२०
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२०
६. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/ योजनेत्तर/प्र.क्र.०१/१९-२०/५८, दिनांक ०७.०९.२०२०

शासन निर्णय :-

मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ व ६ अन्वये चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी यांच्या अखत्यारीतील योजनांतर्गत योजनेतील २८ अस्थायी पदे सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये दिनांक ०१.०३.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालु ठेवण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत विनंती केलेली आहे.

वित्त विभाग संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये **चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी यांच्या अखत्यारीतील योजनांतर्गत योजनेतील २८ अस्थायी पदांना सन २०२०-२१ मध्ये दिनांक ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत** चालू ठेवण्याबाबत मुदतवाढ देण्यात आली आहे.

संदर्भ क्र.५ येथील वित्त विभाग शासन निर्णय दिनांक ३१.०८.२०२० अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु,ज्यांचा समावेश आकृत्तीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या **सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.**

त्यानुसार **चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी यांच्या अखत्यारीतील योजनांतर्गत योजनेतील २८ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत** चालू ठेवण्यास सोबत जोडलेल्या

विवरण पत्रानुसार शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर मुदतवाढ संदर्भ क्र.२ शासन निर्णयान्वये निश्चित केलेला आकृत्तीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

या पदांवर होणारा खर्च मागणी क्रमांक-सी-७, प्रधान शिर्ष २४१५, कृषी विषयक संशोधन व शिक्षण, ०६-वनीकरण, २७७-शिक्षण, (००) (०३) “चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी चंद्रपूर” (२४१५-१०७७) या लेखा शिर्षाअंतर्गत सन २०२०-२१ मध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदर कालावधी मध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. या नंतर सुधारीत आकृतीबंध निश्चीत करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

प्रस्तूत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक-पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००११५४६३५८९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Laxmanrao Kathole

Digitally signed by Sunil Laxmanrao Kathole
DN: CN = Sunil Laxmanrao Kathole, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And forest Department
Date: 2020.10.01 15:48:05 +05'30'

**( सु. ल. काठोळे )**
कक्ष अधिकारी (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति** :-

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य पुणे
५. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य पुणे
६. संचालक, चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी, चंद्रपूर
७. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
९. नियोजन विभाग (कार्यासन १४५४), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०. वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-४/वित्तिय सुधारणा, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवडनस्ती, फ-९ कार्यासन,म. व व.वि,.मंत्रालय,मुंबई-३२.

**शासन निर्णय क्रमांक:-संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४३/फ-९, दिनांक ३० सप्टेंबर, २०२० सोबतचे विवरणपत्र चंद्रपूर वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी यांच्या अधिपत्याखालील अस्थायी पदांची स्थिती:-**

**(दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | शेरा |
|---|---|---|---|
| १ | संचालक (वनरक्षक दर्जा) | १ | शासन निर्णय क्रमांक एफडीएम-२०१५/ प्र.क्र.४५/ फ-२, दि.१३.०२.२०१५ अन्वये |
| २ | शारीरीक शिक्षण निर्देशक | १ | |
| ३ | लिपीक | २ | |
| ४ | प्रयोगशाळा परीचर | १ | |
| ५ | शिपाई | ४ | |
| ६ | मुख्य लेखापाल | १ | |
| ७ | केअर टेकर | १ | |
| ८ | माळी | २ | |
| ९ | सफाई कामगार | २ | |
| १० | चौकीदार | १ | |
| ११ | अपर संचालक (निर्देशक) | १ | |
| | **एकूण** | **१७** | |
| १२ | उपअभियंता | १ | शासन निर्णय क्रमांक एफडीएम-२०१५/ प्र.क्र.७९/फ-२, दि.३१.०३.२०१५ अन्वये (संचालकाचे १ पद द्विरुक्ती झाल्याने कमी करण्यात आले आहे) |
| १३ | लघुलेखक उच्चश्रेणी | १ | |
| १४ | वाहन चालक | २ | |
| १५ | वनरक्षक | २ | |
| १६ | ग्रंथालय परीचर | १ | |
| | **एकुण** | **७** | |
| १७ | सहाय्यक वनसंरक्षक | ३ | शासन निर्णय क्रमांक एफडीएम-२०१४/ प्र.क्र.६२/फ-२ दि.०४.१२.२०१४ नुसार सहाय्यक वनसंरक्षक या पदाची श्रेणी अवनत करुन वनपरिक्षेत्र अधिकारी हे पद दर्शविण्यात येत आहे. |
| १८ | वनपरिक्षेत्र अधिकारी | १ | |
| | **एकुण** | **४** | |
| | **एकुण पदे १७+७+४** | **२८** | |

Sunil Laxmanrao Kathole

Digitally signed by Sunil Laxmanrao Kathole
DN: CN = Sunil Laxmanrao Kathole, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And forest Department
Date: 2020.10.01 15:48:22 +05'30'

**( सु. ल. काठोळे )**
**कक्ष अधिकारी (वने)**
**महसूल व वन विभाग**